**माझी वसुंधरा अभियान ३.० अंतर्गत प्राप्त बक्षीस रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामांसाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास (DPR) प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**
**पाटोदा ग्रामपंचायत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मावअ-२०२४/ प्र.क्र.५० (३४) (ब)/ तां.क.१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: ०६ ऑगस्ट, २०२४

**वाचा:**

(१) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. मावअ-२०२२/ प्र.क्र.१०८/ तां.क.१, दिनांक ७ नोव्हेंबर, २०२२.
(२) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान-२०२३/ प्र.क्र.४६/ तां.क.१, दिनांक ५ जून, २०२३.
(३) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. मावअ-२०२४/ प्र.क्र.१८ (३०) (ब)/ तां.क.१, दिनांक २३ फेब्रुवारी, २०२४
(४) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान-२०२१/ प्र.क्र.५७/ तां.क.१, दिनांक ८ फेब्रुवारी, २०२२
(५) प्रशासकीय मान्यता देण्यासाठी गठित समितीच्या दिनांक १ जुलै, २०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इत्तिवृत्त

**प्रस्तावना :**

माझी वसुंधरा अभियान ३.० मधील ११ गटातील विजेत्यांचा सन्मान दिनांक ०५ जून, २०२३ रोजी करण्यात आला असून, या विजेत्या स्थानिक स्वराज्य संस्थांना रोख रकमांची पारितोषिके व सदर बक्षीस रकमेच्या विनियोगाची कार्यपध्दती संदर्भीय क्रमांक (२) येथील दिनांक ०५ जून, २०२३ च्या शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आली आहे. त्यानुसार, स्थानिक स्वराज्य संस्थांनी पारितोषिकाच्या रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामांचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून, त्यास संदर्भीय क्रमांक (४) येथील दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठित समितीकडून प्रशासकीय मान्यता घ्यावयाची आहे.

२. त्यानुसार, माझी वसुंधरा अभियान ३.० अंतर्गत पाटोदा ग्रामपंचायतीस प्राप्त होणाऱ्या रू. ५०.०० लक्ष बक्षिस रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामाचा रू ५०,२९,०९२.३२ (रूपये पन्नास लक्ष

एकोणतीस हजार ब्याण्णव आणि पैसे बत्तीस फक्त) रकमेचा सविस्तर प्रकल्प अहवाल ग्रामविकास अधिकारी, पाटोदा ग्रामपंचायत यांनी कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, छत्रपती संभाजीनगर यांची तांत्रिक मान्यता घेवून सादर केला होता. सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालातील रु. ११,६६,८३६.६५ किंमतीची कामे वगळून उर्वरित रु. ३८,६२,२५५.६७ किंमतीच्या कामांना संदर्भिय क्रमांक (३) येथील दिनांक २३ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. यामधील रु. ११,६६,८३६.६५ किंमतीच्या कामांचा सविस्तर प्रकल्प अहवाल पुन्हः सादर करण्याच्या सुचना देण्यात आल्या होत्या. तथापी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, छत्रपती संभाजीनगर यांनी पाटोदा ग्राम पंचायतीच्या सविस्तर प्रकल्प अहवालामधून वगळण्यात आलेली रु. ११,६६,८३६.६५ किंमतीची कामे करणे आवश्यक असल्याने या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती त्यांचे दिनांक १२ मार्च, २०२४ चे पत्र क्रमांक जि.प. छसं/ २ पंचायत / कावी/ २०२४ /३०० अन्वये केली आहे.

३. बक्षीस मिळालेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांकडून प्राप्त झालेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १ जुलै, २०२४ रोजी झालेल्या बैठकीत स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालावर चर्चा होवून समितीने शिफारशी केल्या आहेत. समितीने केलेल्या शिफारशीनुसार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, छत्रपती संभाजी नगर यांनी केलेली विनंती लक्षात घेवून पाटोदा ग्रामपंचायतीने सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालातील वगळण्यात आलेल्या रु. ११,६६,८३६.६५ किंमतीच्या कामांचा प्रस्ताव मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या समितीच्या दिनांक १ जुलै, २०२४ रोजी झालेल्या बैठकीत पुन्हा विचारात घेण्यात आला.सदर समितीने केलेल्या शिफारशीनुसार, **पाटोदा ग्रामपंचायतीच्या सविस्तर प्रकल्प अहवालातील रु. ११,६६,८३६.६५ (रुपये अकरा लक्ष सहासष्ठ हजार आठशे छत्तीस आणि पैसे पासष्ठ फक्त)** किंमतीच्या **कामांना खालील अटी व शर्तींच्या अधिन शासन प्रशासकीय मान्यता देत आहे. प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत असलेली कामे सोबतच्या *जोडपत्र-१* मध्ये दर्शविण्यात आली आहेत.**

२. **अटी व शर्ती**

१) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांसाठी कार्यान्वयन यंत्रणा **पाटोदा ग्रामपंचायत** राहील.

२) सदर सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद केलेल्या कामांच्या अंमलबजावणीचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत माझी वसुंधरा अभियान संचालनालयास पाठविण्यात यावा.

३) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांची अंमलबजावणी प्रशासकीय मान्यता मिळाल्यापासून पुढील ६ महिन्यात पूर्ण करावी.

४) बक्षीस रकमेपेक्षा अधिकचा खर्च झाल्यास तो स्वनिधी मधून करण्यात यावा.

५) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास, त्यासाठी कोणताही वाढीव निधी / अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

३. माझी वसुंधरा अभियान ३.० अंतर्गत **पाटोदा ग्रामपंचायत** "ग्रामपंचायत गट (१० हजार पेक्षा कमी लोकसंख्या)" या गटात विभागस्तरावर प्रथम क्रमांकासाठी रू. ५०.०० लक्ष रकमेचे बक्षिस प्राप्त झाले आहे. या बक्षीस रकमेपैकी रु. **२५.०० लक्ष** रकमेचा पहिला हप्ता त्यांना वितरीत करण्यात आला आहे. सदर बक्षीस रकमेमधून घ्यावयाच्या कामांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास संदर्भीय क्रमांक (३) येथील दिनांक २३ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये व उपरोक्त परिच्छेद-१ प्रमाणे शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केली असल्याने **पाटोदा ग्रामपंचायतीस** बक्षिस रकमेचा उर्वरित रू. २५.०० लक्ष (रुपये पंचवीस लक्ष फक्त) रकमेचा दुसरा हप्ता महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळामार्फत वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८०६१५००५१११०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT
KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.08.06 15:39:06 +05'30'

**( सु. कि. निकम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
२) मा. उप मुख्यमंत्री (गृह व ऊर्जा), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
३) मा. उप मुख्यमंत्री (नियोजन व वित्त), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
४) मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
७) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद छत्रपती संभाजीनगर
९) ग्रामविकास अधिकारी/ ग्रामसेवक, पाटोदा ग्रामपंचायत, पाटोदा
१०) निवडनस्ती तां.क.१

*जोडपत्र - १*

शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक **मावअ-२०२४/ प्र.क्र.५० (३४) (ब) / तां.क.१**, दिनांक : ०६ ऑगस्ट, २०२४ चे सहपत्र

| **अ. क्र.** | **कामाचे स्वरूप** | **प्रस्तावित अंदाजपत्रकिय खर्च (रू.)** |
|---|---|---|
| १ | River Rejuvenation at Kham River | ११,६६,८३६.६५ |
| | **एकूण** | **११,६६,८३६.६५** |